"सामाजिक ऐक्य पंधरवडा" २०१९ सांस्कृतिक कार्यक्रमाच्या आयोजनास व खर्चास कार्योत्तर मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण ८२१९/प्र.क्र.२२७/सां.का.४**
**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**
**दिनांक : १७ डिसेंबर, २०१९**

वाचा :- सांस्कृतिक कार्य संचालनालय यांचे पत्र क्र.सां.का.सं/४८९७,
दिनांक २६ नोव्हेंबर, २०१९

## प्रस्तावना

मा. राजीव गांधी, माजी पंतप्रधान यांच्या जन्मदिनानिमित्त राज्यातील विविध प्रदेशातील अनेक भाषा बोलणा-या लोकांमध्ये एकमेकांविषयी ऐक्याची भावना वृध्दींगत करणे व अहिंसेचा प्रसार करणे या हेतूने दिनांक २० ऑगस्ट हा "सदभावना दिवस" म्हणून साजरा करण्यात येतो. यानिमित्ताने दिनांक २० ऑगस्ट ते ५ सप्टेंबर, २०१९ या कालावधीत मुंबईत ६ ठिकाणी संचालनालयामार्फत कार्यक्रमांचे आयोजन करण्यात आले होते. सदर सांस्कृतिक कार्यक्रमांचे आयोजन करण्यासाठी झालेल्या खर्चास कार्योत्तर मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय

या शासन निर्णयान्वये दिनांक २० ऑगस्ट ते ५ सप्टेंबर, २०१९ या कालावधीत सदभावना पंधरवडा प्रित्यर्थ आयोजित करण्यात आलेल्या कार्यक्रमावरील रुपये २,०४,०००/- (रुपये दोन लाख चार हजार फक्त) इतक्या खर्चास खालीलप्रमाणे कार्योत्तर मंजूरी देण्यात येत आहे.

| अ.क्र. | खर्चाचा तपशील | रुपये |
|---|---|---|
| १. | कलाकार मानधन ( सात शाळांमध्ये) | १,४०,०००/- |
| २. | साऊंड व्यवस्था | ४०,०००/- |
| ३. | बोर्ड, बॅनर, डिझाईन व छपाई, फिटींग | १०,०००/- |
| ४. | चहा, अल्पोपहार | १४,०००/- |
| | **एकूण** | **२,०४,०००/-** |

२. यासाठी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना नियंत्रण अधिकारी तसेच लेखाधिकारी, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. हा खर्च मागणी क्र. झेडडी-२, २२०५ कला व संस्कृती, (००) १०२, कला व संस्कृती यांचे प्रचालन, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना - राज्य योजनांतर्गत योजना, (०२) (०२) राज्य नृत्य, नाट्य, तमाशा व संगीत महोत्सव (२२०५ १५०७) ५० इतर खर्च या लेखाशीर्षाखालील सन २०१९-२० या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. सदर प्रस्तावास वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/विनियम, दिनांक १७ एप्रिल, २०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग-३, अ.क्र.४, परिच्छेद क्र. २७ (२) (अ) अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त अधिकारानुसार, संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई यांना प्राप्त खर्च करण्याच्या अधिकारानुसार मान्यता देण्यात येत आहे.

५. तसेच सदर प्रकरणी वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र. अर्थसं २०१९/प्र.क्र. ९२/अर्थ-३, दिनांक ८ जुलै, २०१९ मधील परिच्छेदांची पूर्तता होत असल्याबाबतची जबाबदारी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांची राहील.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१९१२१८१४५२५७२३२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

Vilas Ramrao Thorat

Digitally signed by Vilas Ramrao Thorat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tourism And Cultural Affairs Dept, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e6cc4d20348a52de465c7c34a61591bbe69b747ae11457103a0cfb9a57fc6ce6, serialNumber=cb03c92b399cc89310bf1378c184d97a4b7b9b98e926ea8e71dd7bc9cb273631, cn=Vilas Ramrao Thorat
Date: 2019.12.18 15:03:26 +05'30'

**( विलास रा. थोरात )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. प्रधान सचिव (सांस्कृतिक कार्य), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
२. उप सचिव (सांस्कृतिक कार्य), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
३. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता ) - १, महाराष्ट्र राज्य, मुंबई
५. महालेखापाल (लेखापरीक्षा) - १, महाराष्ट्र राज्य, मुंबई
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - २, महाराष्ट्र राज्य, नागपूर
७. महालेखापाल (लेखापरीक्षा) - २, महाराष्ट्र राज्य, नागपूर
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
९. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१०. निवड नस्ती, सां.का.४